उप अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्रमांक: टिएफएस - २०१८/(०४/२०१८)/आ(वर्ग-२)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १२ जून, २०१८.

-: आदेश :-

बदली अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदींचे पालन करुन खाली नमूद केलेल्या उपअभियंता संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार खालीप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्या कार्यरत कार्यकारी संचालक / मुख्य अभियंता कार्यालय / उपविभागाचे नांव | बदलीने पदस्थापना करण्यात आलेले मंडळ / विभाग / उपविभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. अनिल महादेवराव बोंद्रे | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती अंतर्गत पाटबंधारे उपविभाग क्र.४, महागांव, जिल्हा यवतमाळ | मुख्य अभियंता (स्थापत्य) जलविद्युत व गुण नियंत्रण, पुणे अंतर्गत गुण नियंत्रण उपविभाग, मोर्शी, जिल्हा अमरावती. **(रिक्त पदी) (विनंतीनुसार)** |

२. वरील अधिकाऱ्यांच्या बदल्या त्यांच्या विनंतीनुसार असल्यामुळे त्यांना बदलीबाबतचे फायदे अनुज्ञेय नाहीत.

३. संबंधित महासंचालक / कार्यकारी संचालक /मुख्य अभियंता यांना कळविण्यात येते कि, सदर अधिकाऱ्यांच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश संबंधितांना तात्काळ प्रसृत करावेत. तसेच सदर अधिकाऱ्यास बदलीच्या ठिकाणी हजर होण्याकरिता त्वरित कार्यमुक्त करावे. वर नमूद केलेल्या उपअभियंत्यांच्या बदली दर्शविलेल्या पदावर यापुर्वी कोणी उपअभियंता कार्यरत असल्यास अशा पदी बदली केलेल्या उप अभियंता यांची पदस्थापना करु नये व त्यांचा सविस्तर प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी नव्याने सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकारी यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र तात्काळ नवीन कार्यालयाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

५. तसेच संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये, म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

६. या आदेशाद्वारे बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास रुजू करुन घेतांना, संबंधित प्रशासकीय अधिकारी / कार्यकारी अभियंता यांनी तत्पूर्वी ते रजेवर होते किंवा कसे याची खातरजमा करावी व ते रजेवर असल्याचे आढळल्यास त्यांना हजर करुन घेण्यापुर्वी महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ४० नुसार कार्यवाही करावी व अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१२१६३४३१०६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

तसेच हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या जलसंपदा विभागाच्या wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यावरुन हया आदेशाची प्रत सर्व संबंधितांनी काढून घ्यावी व पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinayak
Vishwanath Lawate

Digitally signed by Vinayak Vishwanath Lawate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb6e5bc7ae10ae9ecaa376fe734f5ee18589f6a42c0c82108b047be5703d1af3, serialNumber=81fd2869906a1aeee21da3e5d509f89daa03571d84025e4321bc9f87546c02a1, cn=Vinayak Vishwanath Lawate
Date: 2018.06.12 16:36:07 +05'30'

**(विनायक लवटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. प्रधान सचिव (ज.सं.प्र. व नि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सह सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, अमरावती.
६. मुख्य अभियंता (स्थापत्य) जलविद्युत व गुण नियंत्रण, पुणे
७. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
८. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
९. आ (वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.